

## १ एप्रिल

**आचार उपासना सोडिती। ते भ्रष्ट अभक्त दिसती।**
**जळो तयांची महती। कोण पुसे।।** (५-२-५६)

सद्गुरू कोणाला म्हणता येणार नाही हे समर्थांनी स्पष्ट शब्दात सांगितले आहे. करामती करून दाखविणारे, चेटूक करणारे, मंत्रविद्येत प्रवीण असलेले, पोट भरण्याची विद्या शिकवणारे, हे सर्व गुरू सद्गुरू नव्हेत. तसेच औषधी प्रयोग, लोखंडादी धातूंचे सोने बनविण्याची किमया, अलंकारशास्त्र, संगीतशास्त्र, रागरागिण्यांचे ज्ञान, गायन, नृत्य, ताल, सूर, अनेक प्रकारची वाद्ये शिकविणारेही सद्गुरू नव्हेत. पिशाच्चे काढण्याची विद्या, नाना व्यापार शिकविणारे, फार काय, गायत्री मंत्र शिकविणारे कुलगुरू हेसुद्धा सद्गुरू नव्हेत. भवसमुद्राच्या पलीकडे नेणारे ज्ञानदाते सद्गुरू वेगळेच असतात. माणसाला बहुतेक गुण दुसऱ्याकडून शिकावे लागतात. खाणे, पिणे, उठणे, बसणे, चालणे, तोंड धुणे, शौच करणे, झोपणे, खेळणे, कपडे घालणे, भाषा बोलणे, अभ्यास करणे, लिहिणे, वाचणे, गाणे म्हणणे, चित्रे काढणे, कीर्तन करणे, यंत्रे बनविणे व ती वापरणे, युद्ध करणे, ज्ञानार्जन करणे, पूजा करणे, प्रवास करणे, वगैरे सगळ्या गोष्टी मनुष्य संपूर्णपणे किंवा अंशतः दुसऱ्याकडून शिकतो. जन्मल्यापासून मरेपर्यंत मनुष्य शिकतच राहतो, म्हणजे गुरू करीत असतो. परमार्थज्ञान देणाऱ्या सद्गुरूभोवती गोळा होणारी माणसे पुष्कळदा सामान्य योग्यतेची असतात. जे परमार्थातील पुढारी सदाचार व उपासना सोडतात ते भ्रष्ट आणि अभक्त होत. अशा लोकांच्या गुरूपणाला आग लागो. त्यांना कोण विचारतो?

**परमार्थात ज्याने गुरुपद घेतले त्याने आपल्या आचरणाची काटेकोर काळजी घ्यायला हवी.**



## २ एप्रिल

**जे जे कांहीं उत्तम गुण। तें तें सद्गुरूचें लक्षण।**
**तथापी सांगों वोळखण। होय जेणें।।** (५-२-६५)

श्रीएकनाथ आणि समर्थांच्या काळी समाजात गुरुबाजी फार बोकाळली होती. स्वधर्मीय आणि परधर्मीय गुरूंचा सुळसुळाट झाला होता. खालच्या जातीचा गुरु केला तर त्याने अनेक अडचणी निर्माण होतात. अशा गुरूच्या पायांचे तीर्थ शिष्याला लोकांसमोर घेता येत नाही. अशा गुरूचा प्रसाद खाल्ला तर नंतर प्रायश्चित्त घ्यावे लागते. बरे, तसे न करावे तरीही गुरुभक्तीचा नाश होतो. गुरू आपल्या जातीचा असावा. नाहीतर निश्चितपणे भ्रष्टाचार होतो. म्हणून ही मर्यादा. वास्तविक जे जे काही उत्तम आहे, भगवंताला पोषक आहे, तेथे सद्गुरूचे अधिष्ठान असते. तरी पण समाजात अनेक प्रकारचे गुरू प्रचलित असतात. ते काही सद्गुरू होऊ शकत नाहीत. मोक्ष देणारा तोच फक्त सद्गुरू होऊ शकतो. सद्गुरूंची बरोबर ओळख होण्यासाठी इतर गुरूंची माहिती समर्थ पुन्हा सांगतात. कुलगुरू, मानलेला गुरू, विद्यागुरू, माता गुरू, पिता गुरू, राजा गुरू, देव गुरू, कोणी स्वप्नगुरू तर कोणी दीक्षा गुरू असतो. कोणी देवाच्या प्रतिमेलाच गुरू मानतात. काहीजण तर म्हणतात - 'आम्ही स्वत:च आमचे गुरू आहोत'. आपल्या जातीचा धंदा शिकविणारे गुरू असंख्य आहेत. आत्मज्ञानातून स्वाभाविकपणे अंगी येणारे अनेक गुण आणि त्याहीपेक्षा अज्ञानी जीवांबद्दल दया असणे हे सद्गुरूचे लक्षण आहे.

**जेथे शुद्ध ब्रह्मज्ञान असते व देहालाही साधन**
**दिले जाते तेथेच सद्गुरूपण जाणावे.**



## ३ एप्रिल

**ऐसे उदंड गुरु। नाना मतांचा विचारु।**
**परी जो मोक्षदाता सद्गुरु। तो वेगळाचि असे।।** (५-२-७२)

गुरुशिष्य परंपरा हे अभ्यासाचे एक प्रधान अंग आहे. प्रश्नोपनिषदात असे वर्णन आहे की सुकेशा, सत्यकाम, गार्ग्य, इत्यादी सहा ऋषी पिप्पलाद मुनींकडे गेले. पिप्पलादांनी त्यांना ठेवून घेतले आणि वर्षभर तप, ब्रह्मचर्य व श्रद्धा यांचे आचरण करवून घेऊन त्यांना परब्रह्माचे ज्ञान करून दिले. तेव्हा त्यांनी त्या थोर मुनीला नमस्कार केला आणि अविद्येच्या पैलतीराला पोहोचविल्याबद्दल कृतज्ञता व्यक्त केली. आपल्याला हवी असलेली विद्या एखाद्यापाशी आहे किंवा नाही हे ओळखून काढणे कठीण नसते; परंतु ब्रह्मविद्या सूक्ष्म असते, त्यामुळे ती कोणापाशी खरोखरच आहे की नाही हे ओळखून काढणे अवघड असते. अध्यात्माच्या गुरुत्वामध्ये त्यामुळे बरीच फसवाफसवी आढळते. म्हणून सद्गुरू कोणाला मानू नये याबद्दल समर्थांनी प्रथम वर्णन केले. संत किंवा सत्पुरुषच सद्गुरू होऊ शकतो. संत आत्मसाक्षात्कारी असतात. ईश्वराला ओळखणे म्हणजे सद्गुरूला ओळखणे. किंबहुना आधी ईश्वराला ओळखावे त्यानंतर सद्गुरूला ओळखता येते. काही सद्गुरू विरक्त ब्रह्मचारी तर काही गृहस्थाश्रमी असतात. अशा सद्गुरूला ओळखून काढणे तर फारच कठीण! असे म्हणतात, की संतांच्या सात गोष्टी पाहू नयेत. शरीराचा रंग, नाक, डोळे, वय, लौकिक विद्या वा शिक्षण, नातेवाईक, भाषाशुद्धी आणि राहते घर. सद्गुरुत्व बाहेरून बघायचे नसते. त्यांची अंतरंगधारणा बघावी. गुरूंची संख्या फार मोठी आहे. त्यात प्रत्येक गुरूचे मत वेगळे असते. परंतु या सर्वांहून मोक्षदाता सद्गुरू मात्र वेगळाच असतो.

**संपूर्ण मानवता व दिव्य ईश्वरत्व यांचा मधुर संगम सद्गुरूत झालेला असतो.**



## ४ एप्रिल

**सद्गुरुविण सच्छिष्य। तो वायां जाय निःशेष।**
**कां सच्छिष्येंविण विशेष। सद्गुरू सिणे।।** (५-३-२)

भोंदू गुरूंविषयी श्रीसमर्थ सात्त्विक संतापाने लिहितात - **शिष्यास न लाविती साधन। न करविती इंद्रिय दमन। ऐसे गुरू अडक्याचे तीन। मिळाले तरी टाकावे** (५-२-२१). काही गुरू अद्वैतज्ञानाचे निरूपण करण्यात वाक्चतुर असतात. परंतु त्यांच्या मनात मात्र विषयांची लालसा असते. अशा गुरूंकडून शिष्याच्या जीवनाचे काय सार्थक होणार? निःशेष कामरहित असा संत विरळाच. नवविधा भक्तीचा आधार, आणि आंतरिक ब्रह्मज्ञान असलेला सद्गुरूच खरा तारक असतो. त्याच्यात ज्ञान, वैराग्य, भजन, स्वधर्मकर्म आणि साधना, कथानिरूपण, श्रवण, मनन, नीतीन्याय, मर्यादा या सर्वांचा समुच्चय झालेला असतो. समर्थांनी मुळाक्षरे शिकविणाऱ्या गुरूपासून आई, वडील, कुलगुरू आणि जगद्गुरु असे सतरा गुरू वर्णन केले आहेत. सद्गुरूंचे लक्षण सांगितल्यावर सच्छिष्य कसा असावा हे समर्थ वर्णन करतात. त्यासाठी त्यांनी १०४ ओव्या लिहिल्या आहेत. सच्छिष्याला सद्गुरू भेटला नाही तर तो संपूर्ण वाया जातो. तसेंच सद्गुरूला सच्छिष्ट भेटला नाही तरीही मोठे श्रम होतात. शिष्याला सच्छिष्य बनविण्याचे महान कष्ट सद्गुरूला करावे लागतात. सच्छिष्याच्या अनेक लक्षणांत दृश्याची संपूर्ण अनासक्ती, मनाचा खरा मोठेपणा किंवा उदारता, 'सर्वभावें स्वभावें' अत्यंत लीनता, सद्गुरूवर निर्व्याज, निश्चल निष्ठा आणि साधनाची सतत संगती ही पाच लक्षणे म्हणजे पंचप्राणच होत.

**शुकमुनींसारखे पूर्ण वैराग्य, वसिष्ठांसारखे ज्ञान आणि वाल्मीकींसारखे कवित्व यांचा त्रिवेणी संगम सद्गुरू श्रीसमर्थ रामदासस्वामी यांच्यात झाला आहे.**



५ एप्रिल

**काखे घेऊनियां दारा। म्हणे मज संन्यासी करा।**
**तैसा विषयी सैरावैरा। ज्ञान बडबडी।।** (५-३-६६)

शिष्यही गुरूप्रमाणेच अधिकारी असावा लागतो हे पटवून देण्यासाठी समर्थांनी एक उत्तम उदाहरण दिले आहे. धान्य उगवायचे आणि वाढावयाचे तर चार शक्यता संभवतात. जमीन उत्तम असली, पण त्यात पेरलेले बियाणे किडके असले तर? बियाणे उत्तम पण ते खडकावर पेरले तर? भूमी उत्तम, बियाणेही चांगले पेरलेले पण पाऊस पडला नाही तर? बरे, जमीन उत्तम, बियाणे चांगले, पाऊस वेळेवर पडला पण उगवलेल्या शेताची निगा व राखण केली नाही तर? या सर्व परिस्थितीत प्रयत्न व्यर्थ जातात. तसेच सद्गुरू आहे परंतु सच्छिष्य नसला; सच्छिष्य आहे पण सद्गुरू भेटला नाही; सद्गुरू आणि सच्छिष्य भेटले पण अध्यात्मनिरूपण झाले नाही किंवा अध्यात्मनिरूपण होऊनही साधकाने साधन केले नाही तर सर्व प्रयत्न व्यर्थ जातात. म्हणून साधन, अभ्यास, सच्छिष्य, सच्छास्त्रविचार, सत्कर्म व सद्वासना या सर्वांचा मिलाप झाला तरच विमल ज्ञानाची प्राप्ती होते. सद्गुरूमुळे वाईट शिष्य चांगला होतो. परंतु चांगला शिष्य असद्गुरूत बदल करू शकत नाही. सच्छिष्य होणे सोपे नाही. शिष्य जितका संसाराने दुःखग्रस्त तेवढा परमार्थात त्याला अग्र हस्त. जो संसारदुःखाने आणि त्रिविध तापाने पोळतो, तोच परमार्थाचा अधिकारी होतो! अन्यथा बायको काखेत धरून संन्यासदीक्षा मागणारा स्त्रीलंपट साधक काय कामाचा? तसेच ज्याच्या चित्तात विषयांचा जोर असतो, परंतु बाहेरून मात्र जो ब्रह्मज्ञानाची बडबड करतो, त्याचा काय उपयोग?

**शिष्याला सद्गुरूहून देवही मोठा वाटत नाही.**



## ६ एप्रिल

**प्रपंच सुखें करावा। परी कांहीं परमार्थ वाढवावा।**
**परमार्थ अवघाचि बुडवावा। हें विहित नव्हे।।** (५-३-१०३)

परमार्थ करताना संसाराची गोडी मनात राहिली तर त्या साधकाची गत कशी होते त्याचे सुंदर वर्णन समर्थ करतात. एखाद्या गाढवाला उटणे किंवा रेड्याला चंदनाचा लेप लावावा तसे आसक्त मनुष्याला ब्रह्मज्ञान सांगणे फुकट आहे. उकिरड्यावर लोळणाऱ्या गाढवाला सुगंधी अत्तराची काय किंमत? अंधारातच फिरणारे घुबड हंसांच्या रांगेत दिवसा कसे बसणार? दात विचकून हाडे चघळणारा कुत्रा आणि विषयसुखाला चटावलेला आणि त्यासाठी तळमळणारा मनुष्य सारखाच. राजहंसांच्या मेळाव्यात डोमकावळा आला तरी तो विष्ठेवरच बसतो, त्याची नजर तिकडेच असते, तशीच गत विषयलंपट मनुष्य ज्ञानी मनुष्यांच्या मेळाव्यात बसल्यावर होते. सुंदर स्त्रियांचे मुख बघण्यासाठी कीर्तनाला वा प्रवचनाला जाणारे काही विषयलंपट असतातच. विषयसुखाचा पोटात हव्यास आणि वरून परमार्थाचा खोटा अभ्यास, अशा शिष्याला ज्ञान देणे म्हणजे कुत्र्याला मिष्टान्न किंवा माकडाला सिंहासन देण्यासारखे आहे. व्यवहार आणि परमार्थ ह्या दोन्ही धोंड्यांवर पाय ठेवणारा पढतमूर्ख होय. एकसारखे गुरू बदलणारे शिकतात ते फक्त शब्दपांडित्य. वरून सांगे ब्रह्मज्ञान पण आतून कोरडा पाषाण, असे ते असतात. प्रपंच सुखाने करावा. त्यात गुंतून परमार्थ बुडवू नये. तो देखील वाढवावा. परमार्थ संपूर्ण बुडवावा हे योग्य नाही.

**दोन दिवसांचे शिष्य होऊन उदंड गुरू करणारे लोक पुष्कळ असतात.**



## ७ एप्रिल

**ऐसे नाना परीचे मंत्री। उपदेशिती कर्णपात्रीं।**
**जप ध्यान पूजा यंत्रीं। विधानयुक्त सांगती।।** (५-४-१२)

आत्मज्ञान प्राप्त होण्यासाठी साधकात काही गुण असावे लागतात. ते नसले तर अभ्यासाने मिळवावे लागतात. मुंडक उपनिषदात यासंबंधी तीन अर्थपूर्ण मंत्र आहेत. 'नायमात्मा प्रवचनेन लभ्य:। न मेधया, न बहुना श्रुतेन।' हा आत्मा केवळ निरूपणाने, कुशाग्र बुद्धीच्या साह्याने किंवा पुष्कळ पांडित्य श्रवण करण्याने प्राप्त होत नाही. 'नायमात्मा बलहीनेन लभ्य:' दृढता, चिकाटी व निश्चयाचे बळ नसेल तर आत्मा प्राप्त होत नाही. 'सत्येन लभ्य: तपसा हि एष आत्मा। सम्यग् ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम्।। हा आत्मा सत्याने, तपाचरणाने, यथार्थ किंवा खऱ्या ज्ञानाने आणि निरंतर साधनाने प्राप्त होतो. शक्तिशाली दुर्बिणीतून, चर्मचक्षूंना सहज न दिसणारे गुरुग्रहाभोवतालचे चंद्र दिसतात. तसेच सद्गुरुच्या मार्गदर्शनाखाली जर एखाद्याने देहाला, इंद्रियांना, मनाला व बुद्धीला विशिष्ट प्रकारची शिस्त लावली तर त्याचा जीव अत्यंत सूक्ष्म आणि व्यापक बनून त्याची सुप्त ज्ञानकळा जागृत होते आणि अतींद्रिय सृष्टीत तो संचार करू लागतो. अखेर परमात्मवस्तू साक्षात त्याच्यासमोर येते. तोच आत्मसाक्षात्कार होय. नाना प्रकारचे मंत्र आहेत. ओंकाराचा जप, शिव, भवानी, विष्णू, महालक्ष्मी, रघुनाथ, भैरव, मल्हारी, हनुमंत, यक्षिणी, नारायण, पिशाच्च, वेताळ, झोटिंग आदींचे अनेक मंत्र आणि शक्तींची यंत्रेही काही गुरू शिकवितात.

**एकनाथांची व सद्गुरू जनार्दन स्वामींची भेट झाल्यावर तसेच कल्याणस्वामींची व समर्थ रामदासांची भेट झाल्यावर त्यांना धन्य वाटले. ही गुरुशिष्यसंबंधांची आदर्श उदाहरणे आहेत.**



## ८ एप्रिल

**ऐसे उपदेशक अनेक। परी ज्ञानेंविण निरर्थक।**
**येविषयीं असे येक। भगवद्‌वचन॥** (५-४-३१)

मंत्रांचा उपयोग करून काही व्यावहारिक गोष्टी साध्य करून घेणे शक्य आहे. परंतु मंत्रशास्त्राला आत्मज्ञानाची पार्श्वभूमी नसेल तर मंत्रांचा सगळा पसारा व्यवहारातील शुभ वा अशुभ वासना तृप्त करण्यासाठी उपयोगात आणला जातो आणि शेकडा ९९ टक्के मंत्रवादी लोक स्वार्थासाठीच मंत्र वापरतात. काही गुरू भगवंताच्या विविध नामांचा जप सांगतात. त्यालाही आत्मज्ञानाची पार्श्वभूमी हवी. **येक शिवशिव सांगती। येक हरिहरि म्हणविती। येक उपदेशिती। विठ्ठल विठ्ठल म्हणोनी॥** (५-४-१३). अशा प्रकारे कृष्ण, विष्णू, नारायण, अच्युत, अनंत, दत्त, राम, गुरू, परमेश्वर, विघ्नहर इत्यादी अनेक देवतांचे नाममंत्र आहेतच. त्यांच्याच जोडीला योगासने, कर्म, ज्ञान, भक्ती असे अनेक मार्ग, महावाक्यांचा जप, तीर्थयात्रा, शक्तिमार्ग, वशीकरण, आणि चेटूकविद्या असे विविध उपदेश आहेतच, तरी ते सगळे आत्मज्ञानाविना निरर्थक ठरतात. येथे समर्थ भगवंताच्या एका वचनाचा आधार घेतात. नानाशास्त्रं पठेत् लोको नाना दैवतपूजनम्। आत्मज्ञानं विना पार्थ सर्वकर्म निरर्थकम्॥ तीर्थयात्रा, मंत्रतंत्राहून कोटीपटीने अधिक फलदायी असते. ब्रह्मज्ञानाचे फळ जे आत्मज्ञान ते तर गहनाहून गहन आहे.

**नाना शास्त्रांचा अभ्यास व नाना दैवतांचे पूजन**
**हे सारे आत्मज्ञानावाचून निरर्थक ठरते**



## ९ एप्रिल

**भूत भविष्य वर्तमान। ठाऊकें आहे परिच्छिन्न।**
**यासीहि म्हणिजेत ज्ञान। परी तें ज्ञान नव्हे।।** (५-५-३)

विश्वात आत्मा व अनात्मा असे दोन घटक आहेत. आत्मा सूक्ष्म व स्वयंप्रकाशी तर अनात्मा स्थूल व परप्रकाशी आहे. त्यातही दृश्य आणि अदृश्य स्थूल असे स्थूलाचे दोन भाग आहेत. इंद्रियांना दिसणारे जग हे दृश्य स्थूल. उदाहरणार्थ - वृक्ष, जनावरे, माणसे, घरे, पर्वत, समुद्र वगैरे व इंद्रियांना न दिसणारे परंतु मन व बुद्धीला आकलन होणारे जग हे अदृश्य स्थूल होय. उदाहरणार्थ - निसर्गाचे नियम, वस्तूंचे अंतरंग, ध्येये, मूल्ये, अर्थ, परमाणू, वासना, भावना, विचार, इत्यादी. दृश्य व अदृश्य स्थूलाच्या अभ्यासाने मनुष्य जे ज्ञान मिळवितो त्याला विज्ञान म्हणतात. देहबुद्धीच्या ज्ञानाची कक्षा अदृश्य स्थूलापर्यंत पोहोचते. सर्वसाधारण मनुष्य त्यालाच ज्ञान समजतो. परंतु ते आत्मज्ञान नव्हे. खरे ज्ञान कोणते नाही, हे समजण्यासाठी आत्मज्ञानातून निराळ्या ज्ञानांची उदाहरणे समर्थांनी दिली आहेत. एखादा ज्योतिषी, भूत, भविष्य आणि वर्तमान हे सगळे अगदी बरोबर जाणतो, पण त्याचे ज्ञान आत्मज्ञान नव्हे.

**लौकिक ज्ञान व पारलौकिक ज्ञान यांच्यापेक्षा**
**आत्मज्ञान अगदी वेगळे आहे.**



## १० एप्रिल

**जाणावे दुसऱ्याचे जीवींचें। हे ज्ञान वाटे साचें।**
**परंतु हें आत्मज्ञानाचें। लक्षण नव्हे॥** (५-५-३४)

विविध परीक्षा करता येणे म्हणजे खरे आत्मज्ञान नव्हे. अनेक दीक्षा, स्त्रिया, घोडे, माणसे, हत्ती, श्वापदे, पशूपक्षी, भूते, वाहने, वस्त्रे, शस्त्रे, धातू, नाणी, रत्ने, पाषाण, लाकडे, वाद्ये, भूमी, पाणी, तेजस्वी पदार्थ, रस, बीजे, अंकुर, फुले, फळे, वेली, दुःखे, रोग, शकुन, मंत्र-यंत्र, मुहूर्त, क्षेत्रे, घरे, भांडी, भविष्य, तर्क, अनुमान, सिद्धान्त, विद्या, कला, चातुर्य, शब्द, अर्थ, भाषा, स्वर, वर्ण, लेखन, वृत्ती, रूप, रसना, सुगंध, चतुर्विध सृष्टी, इत्यादींची परीक्षा म्हणजे शुद्ध ज्ञान नव्हे. तसेच मार्मिक, समयसूचक उत्तर देणे, शीघ्र कवित्व करणे, नेत्रपल्लवी, विविध आवाज काढणे, करपल्लवी, भेदनीती, कवित्व, संगीत, गायन, नाटकांची रचना, नृत्यकला, सभाचातुर्य, वक्तृत्व, मोहक गोड बोलणे, हास्यविनोदातील चातुर्य, चित्रकला, अशा अनेक प्रकारच्या चौदा विद्या आणि चौसष्ट कला व त्यांच्या सिद्धी हे सुद्धा शुद्ध ज्ञान नव्हे. सर्व कलांत पारंगत असणे म्हणजे आत्मज्ञान नव्हे. हे सारे ज्ञान आहे असे वाटते पण शुद्ध ज्ञान ते वेगळेच आहे. ही सर्व मायेची किमया. तर मग दुसऱ्याच्या मनातील ओळखणे हे खरे ज्ञान मानावे काय? याचेही उत्तर 'नाही' असेच आहे. कोणी एक मनुष्य मानसपूजा करताना चुकला. ते दुसऱ्याने अंतर्ज्ञानाने ओळखून 'असे नव्हे, तुम्ही इथे चुकता', असे स्पष्ट सांगितले, तर तेही शुद्ध आत्मज्ञान नव्हे.

**अंतर्ज्ञानाला आत्मज्ञान म्हणता येत नाही.**



## ११ एप्रिल

**ऐका ज्ञानाचें लक्षण। ज्ञान म्हणजे आत्मज्ञान।**
**पाहावें आपणासि आपण। या नांव ज्ञान।।** (५-६-१)

मग आत्मज्ञान म्हणजे आहे तरी काय? तैत्तिरीय उपनिषदात सांगितले आहे - सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म। ऐतरेय उपनिषद म्हणते - ज्ञानं ब्रह्म! आत्मस्वरूप आणि ज्ञान अभिन्न आहेत, एकरूप आहेत. असा येथे स्पष्ट अभिप्राय दिला आहे. माणसाच्या हृदयात आत्मा वास करतो. ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति। असे भगवद्गीतेतील वचन आहे. जसे अन्न, पाणी व हवा यांवाचून देह चालत नाही, तसे ज्ञानावाचून मानवी जीवन चालत नाही. प्रथम ज्ञाता, त्यानंतर मनुष्य कर्ता व भोक्ता होतो. ज्ञानाचे प्रधान साधन बुद्धी हे आहे. ज्ञानाचे स्वरूप, मार्ग, कक्षा आणि भांडार माणसाच्या बुद्धीवर अवलंबून असतात. बुद्धीत फरक पडला की ज्ञानात आपोआप फरक पडतो. बालपणी खेळण्यात दंग, तरुणपणी तरुणीची आसक्ती, म्हातारपणी काळजी, असा बुद्धीचा बदल होत असतो. संतांच्या मते ज्ञानाच्या अवस्था फक्त दोन. एक ज्ञानाची व दुसरी अज्ञानाची. एक आत्मबुद्धीची व दुसरी 'मी देह आहे' ह्या देहबुद्धीची. देहबुद्धीत बुद्धीचे तोंड इंद्रियांकडे आणि इंद्रियांचे बाह्य पदार्थांकडे असते. याउलट आत्मबुद्धीत इंद्रियांचे तोंड बुद्धीकडे आणि बुद्धीचे तोंड आत्म्याकडे असते. देहबुद्धीच्या ज्ञानात ज्ञाता ज्ञेयाहून सदा भिन्न राहतो, तर आत्मबुद्धीत ज्ञाता ज्ञेयाशी तद्रूप होऊन अद्वैताने राहतो.

**आत्मबुद्धीचे ज्ञान मायातीत असते म्हणून ते निश्चित व संशयरहित असून त्याने संपूर्ण समाधान मिळते.**



## १२ एप्रिल

**महावाक्य - उपदेश भला। परी त्याचा जप नाहीं बोलिला।**
**तेथींचा तो विचारचि केला। पाहिजे साधकें॥** (५-६-११)

देहबुद्धीच्या तीन अवस्था ओलांडून चौथ्या अवस्थेत प्रवेश केला की आत्मबुद्धी उदय पावते. पण ती सुद्धा मावळते. जेव्हा केवळ **स्वरूप** उरते, ते खरे ज्ञान समजावे. जागेपणा, स्वप्न, गाढ झोप, यापलीकडील चौथी अवस्था सर्वसाक्षी असते. म्हणून तिला आत्मज्ञान म्हणतात. परंतू त्याही अवस्थेत साक्षित्वाने पदार्थज्ञान असतेच. म्हणून त्याने पूर्ण समाधान होत नाही. आत्मस्वरूपात स्वरूपाखेरीज काहीच उरत नाही. सर्वसाक्षी भाव त्यात असू शकत नाही. म्हणून तुर्या अवस्थेतील ज्ञान शुद्ध आत्मज्ञान मानू नये. 'मी तुला जाणतो', या वाक्यात 'मी' हा ज्ञाता व 'तू' ही जाणावयाची वस्तू म्हणजे ज्ञेय होय. म्हणून तेथे द्वैत आढळते. तुर्या अवस्थेत, 'मी देहच आहे', हे ज्ञान लोपते, परंतू 'मी आत्मा आहे, मी दृश्य पदार्थांहून निराळा आहे, मी त्यांना वेगळेपणाने पाहतो', हे ज्ञान असते. हीच सर्वसाक्षी अवस्था. त्यात दृश्य ज्ञेयपणाने वेगळे राहते. तेच द्वैत. उपनिषदांतील 'तत्त्वमसि', 'अहं ब्रह्मास्मि' 'सोऽहं' इत्यादी महावाक्यांत आत्मज्ञानाचे सारे रहस्य साठविलेले आहे. पण या वाक्यांचा नुसता जप करून चालत नाही. त्यावर मनन करून साधकाने त्यांचा प्रत्यक्ष अनुभव घेतला पाहिजे. महावाक्यांचा उपदेश उत्तमच आहे. परंतु त्यांचा जप करण्यास सांगितलेला नाही. साधकाने महावाक्यांच्या अर्थाचा विचार केला पाहिजे, त्यांचे मनन आवश्यक आहे.

**'मी देह आहे', ही दृढ भावना म्हणजे देहबुद्धी, तर**
**'मी आत्माच आहे', ही दृढभावना म्हणजे आत्मबुद्धी होय.**



## १३ एप्रिल

**अखंड घडे श्रवण मनन। तरीच पाविजे समाधान।**
**पूर्ण जालिया ब्रह्मज्ञान। वैराग्य भरे आंगीं।।** (५-६-५९)

साक्षीत्व ही देखील एक वृत्तीच आहे. म्हणून मनाचा लय होऊन साक्षीत्वही जेथे नाहीसे होते तीच उन्मनी अवस्था. महावाक्यांचा लक्ष्यार्थ लक्षात घेतला असता, आपण स्वत:च ब्रह्मस्वरूप आहोत, हे अनुभविता येते. आत्मज्ञान म्हणजे अद्वैत. आपला आपणाला लाभ होणे, हे ज्ञान परम दुर्लभ आहे. व्यासमहर्षी, वसिष्ठ महामुनी, शुक्राचार्य, नारद, जनक, वामदेव, वाल्मीकी, अत्रि आदी ऋषीश्वर, गौतमऋषी, सनक, वगैरे अध्यात्मज्ञानी, आदिनाथ, मीननाथ, गोरक्षनाथ वगैरे नवनाथ, शुद्ध ज्ञानाच्या साहाय्यानेच मुक्त झाले. शंकर त्याच ज्ञानानंदात सदैव मग्न होऊन डुलत असतात. हे शुद्ध ज्ञान गुरुकृपेमुळेच मिळते. छप्पन भाषा, तितके वेदान्त ग्रंथ, संस्कृत किंवा प्राकृत भाषांचे ज्ञान असल्याशिवाय हे शुद्ध ज्ञान मिळणार नाही, असे जर कोणाला वाटत असेल तर तो समज चुकीचा आहे. तो भ्रम आहे. कारण न शिकलेल्या - अक्षरशत्रू - व्यक्तीलाही सद्गुरुकृपेने त्या शुद्ध आत्मज्ञानाचा लाभ होऊ शकतो. 'अहं ब्रह्मास्मि' मी ब्रह्म आहे, इत्यादी महावाक्यांची पोपटपंची करता येते पण त्यांचा अनुभव सद्गुरुकृपेनेच येतो. देह म्हणजे मी असे वाटणे ही जणू आत्महत्याच होय. अखंड श्रवण आणि मनन केले तर समाधान होते. ज्याला विषयांबद्दल व त्यांतील सुखांबद्दल पूर्ण वैराग्य वाटू लागते त्यालाच पूर्ण ज्ञान होते.

**वेदान्त थोर असला तरी खरे सांगायचे तर**
**सद्गुरुवचन हेच सर्वांत श्रेष्ठ आहे.**



## १४ एप्रिल

**न कळे भक्ति न कळे ज्ञान। न कळे वैराग्य न कळे ध्यान।**
**न कळे मोक्ष न कळे साधन। या नांव बद्ध।।** (५-७-१२)

मनुष्य विषयांची लालसा धरून आत्मज्ञानाच्या आनंदाचे राज्य गमावून बसतो. विरक्ती जाणण्याकरिता केले पाहिजे साधन, सोडून दिला पाहिजे अहंकार. झोपेत खऱ्या म्हणून पाहिलेल्या गोष्टी जागे झाल्यावर खोट्या ठरतात. त्याचप्रमाणे जागेपणी व्यवहार करताना जागृत अवस्था, हीही मिथ्याच आहे, याची जाणीव ठेवावी. जो विरक्त नसून साधनही करीत नाही व स्वत:ला सिद्ध समजतो तो बद्धच होय. असल्या सिद्धापेक्षा मुमुक्षू बरा.

जगातील जीवांचे चार अवस्थांत वर्गीकरण करता येईल. या अवस्था म्हणजे बद्ध, मुमुक्षु, साधक आणि सिद्ध. त्यातील कोणत्यातरी अवस्थेत जगातील सर्व प्राणी असतात. त्यातील बद्ध म्हणजे तमोमय, अज्ञानात वावरणारा असा जीव. त्याला भक्त, ज्ञानी, तापसी, किंवा योगी दिसतच नाहीत. भक्ती, ज्ञान, वैराग्य, ध्यान, मोक्ष आणि साधन या गोष्टी कळत नाहीत. जगात ज्ञानी किंवा अज्ञानी असे सर्व माणसांचे दोनच पर्याय संभवतात. पृथ्वीला समांतर असणाऱ्या एका रेषेवर सर्व माणसे उभी आहेत अशी कल्पना कोणी केली तर त्या रेषेचा आरंभ बिंदू म्हणजे अज्ञानी, तर रेषेचा अंतिमबिंदू म्हणजे ज्ञानी मनुष्य, असे समजावे. ज्या प्रमाणात माणसाच्या मीपणाचे, अहंपणाचे खरेपण कमी होत जाईल त्या प्रमाणात आत्म्याचे खरेपण त्याच्या अनुभवास येईल.

**अज्ञानरूपी सन्निपाताच्या तापात मिथ्या जगावर बसते**
**आसक्ती तर ज्ञानाचे औषध घेताच त्यातून होते मुक्ती.**



## १५ एप्रिल

**जागृति स्वप्न रात्रिदिवस। ऐसा लागला विषयध्यास।**
**नाहीं क्षणाचा अवकाश। या नांव बद्ध।।** (५-७-४८)

अज्ञानाचे मुख्य लक्षण जो देहाभिमान, तो कमी कमी होत जाणे हे पारमार्थिक प्राप्तीचे मुख्य लक्षण समजावे. समर्थ अत्यंत अज्ञानी माणसाला बद्ध म्हणतात. संपूर्ण आत्मज्ञानी माणसाला ते सिद्ध म्हणतात. मुमुक्षु म्हणजे मोक्षाची इच्छा असणारा, तर साधक म्हणजे साधन करणारा. परमार्थाच्या प्रगतिपथावर बद्धापेक्षा मुमुक्षू बरा. मुमुक्षूहून साधक अधिक उत्तम, तर साधकाहून सिद्ध सर्वोत्तम होय. **न कळे आपणास आपण। या नांव बद्ध।** (५-७-१४). तमोगुणी व रजोगुणी माणसाची लक्षणे बद्धाच्या लक्षणांशी बहुतेक जुळतात. बद्ध जीव अनेक दोष करतो. बाष्कळपणा करतो. सुखाचा किंवा दुःखाचा दोहींचा त्याच्या हातून अतिरेक होतो. बद्ध प्रपंचाचा अत्यादर करतो तर परमार्थाचा अनादर. संतांची निंदा त्याला आवडते तर सत्संगती त्याला आवडत नाही. हातात द्रव्याची जपमाळ आणि मनात स्त्रीचे ध्यान सर्वकाळ! अशी बद्धाची स्थिती असते. द्रव्य आणि दारा, यांच्याच दर्शनाला, स्पर्शाला व चिंतनाला बद्ध थारा देतो. पैसा व स्त्री हीच त्याची तीर्थयात्रा. तोच त्याचा परमार्थ. तोच सारा स्वार्थ! तो सदैव संसाराच्या चिंतेत असतो. जागा असो, वा स्वप्नात, त्याला असतो एकच ध्यास. तो म्हणजे विषयसुखाचा. बद्धाची ही लक्षणे वाचीत असताना बहुतांश माणसांना त्यात स्वतःचे प्रतिबिंब दिसले, तर त्यात नवल नाही.

**बद्ध मनुष्याचे प्रपंचाविषयी उदंड ज्ञान असते.**
**पण परमार्थाविषयी तो पूर्ण अज्ञानी असतो.**



## १६ एप्रिल

**स्वार्थ सांडून प्रपंचाचा। हव्यास धरिला परमार्थाचा।**
**अंकित होईल सज्जनाचा। म्हणे तो मुमुक्षु।।** (५-८-४३)

बद्धतेच्या चक्रव्यूहातून सुटायचे असेल तर मुमुक्षू झाले पाहिजे. मानवी जीवनाला पशुपणाचे आणि देवपणाचे अशी दोन अंगे असतात. पशुपणा अज्ञानाशी निगडित असतो तर देवपणाचे अंग आत्मज्ञानाशी संबंधित असते. बद्ध मनुष्य पशुपणाचे जीवन जगत असतो. त्याच्या सर्व क्रिया देहाभोवती केंद्रित असतात. द्रव्य, स्त्री आणि प्रपंच या ठिकाणी त्याची बुद्धी घट्टपणे चिकटलेली असते. ती तेथून स्थानभ्रष्ट झाल्याशिवाय देवपणाचा किंवा शाश्वत आत्मज्ञानाचा मार्ग मोकळा होत नाही. रोग, दैन्य, गरीबी, अपघात, स्वजनांचा आकस्मिक मृत्यू, इत्यादी आपत्तींनी माणसाचे अंत:करण गदागदा हालते. त्याच्यातला देवपणा जागृत होतो आणि तो पशूपणातून बाहेर पडण्यासाठी तळमळू लागतो. त्या मनाच्या अवस्थेला मुमुक्षूपणा म्हणतात. तो उदय पावला की माणसाला आपले पूर्वायुष्य आठवते. आपल्या हातून घडलेल्या चुकांची व कुकर्मांची आठवण येऊन त्याला अतिशय वाईट वाटते. तोच अनुताप. असा अनुताप होतो तेव्हाच परमार्थ साधतो. पूर्व जीवनाबद्दल अनुताप, आणि आत्मज्ञानाबद्दल तळमळ ही मुमुक्षूची दोन अंगे आहेत. मुमुक्षूचा स्वार्थ सुटतो, त्याच्या मनात परमार्थाची उत्कट इच्छा उत्पन्न होते आणि मी संतांचा होऊन राहीन अशी त्याला मनापासून तळमळ लागते, तो मुमुक्षू असतो. संतांनी सांगितलेले साधन करू लागतो तेव्हा तो साधक बनतो.

**अनुतापाने पूर्वीच्या जीवनपद्धतीत आमूलाग्र बदल होतो**
**म्हणून संत मुमुक्षूपणाला नवीन जन्म म्हणतात.**



## १७ एप्रिल

**अवगुणाचा करूनि त्याग। जेणें धरिला संतसंग।**
**तयासी बोलिजे मग। साधक ऐसा।।** (५-९-२)

मुमुक्षू जीव गुरूचा शोध करू लागतो. गुरूच्या उपदेशाने त्याच्यात पालट होतो. संसारातील वैभव चिरकाल टिकणारे नाही हे त्याला पटते. आपले अवगुण व दोष त्याला स्वच्छ दिसू लागतात आणि तो आपली आपणच निंदा करून लागतो. आपल्या पापांचा पाढा वाचतो. मग तीर्थाटन, शम-दमादी साधनांचा प्रयोग, नाना अध्यात्मिक ग्रंथांचे वाचन, असे प्रयत्न चालू होतात. पण त्या सर्वांमुळे खरे समाधान लाभत नाही. तेव्हा संतांपुढे त्याची मान झुकते. मुमुक्षूला प्रगतीसाठी साधक व्हावे लागते. अवगुणांचा त्याग करून संतांना शरण जातो तो साधक. त्याला संतांचे आश्वासन मिळते. संतांच्या उपदेशाने होते ज्ञान आणि मग संपतो विषय - काम. आत्मज्ञानाचा उपदेश दृढ व्हावा म्हणून साधकाचे साधन चालू होते. अद्वैत निरूपणाची गोडी लागून साधक आपल्या देहावरची ममता विचारपूर्वक सोडतो. श्रवण आणि मनन पुनः पुनः करतो. तो दृश्यपणाचे भान विसरतो. तेव्हा त्याला आत्मज्ञानातच समाधान वाटते. मग तो तोडून टाकतो द्वैताची उपाधी. तेव्हा लागते ऐक्याची समाधी. जिथे मनच मावळते, तर्क पांगळा होतो, त्या रहस्याचा अनुभव आत्मज्ञानाच्या सामर्थ्याने साधक घेऊ लागतो आणि त्याची बुद्धी आत्मरूपात दृढ होते. मग तो साधक तुर्या अवस्थेलाही मागे टाकतो.

**मुमुक्षू संतसंग धरण्याची इच्छा करतो पण**
**साधक ती इच्छा प्रत्यक्षात आणतो.**



१८ एप्रिल

**जयास अखंड स्वरूपस्थिती। नाहीं देहाची अहंकृती।**
**सकळ संदेह निवृत्ती। या नांव साधक॥** (५-९-२९)

साधकाचा मीपणा जातो. स्वत:ला त्याने शोधलेले असते. तो देहात असूनही विदेही होतो. पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश या पंचमहाभूतांचा विस्तार त्याला जाणवू लागतो. स्वप्नातील अनुभवाप्रमाणे माया, जाणीव, बाह्य अनुभव मिथ्या आहेत, हे साधकाला उमगते व तो कामक्रोधादी षड्रिपूंवर मात करतो, विकल्परहित होतो. संसार-सागर तरून जाणे त्याला सोपे होते. त्याच्या अंगात वैराग्याचे बळ संचार करते. तो आळसाचा आळस करतो.

बासष्ट ओव्यांचा हा समास समर्थांच्या मोहक भाषा-शैलीचे उदाहरण आहे. या समासातील ओव्यांत एक विलक्षण गतिमानता, जोश आणि आवेश आहे. त्याचा अनुभव येण्यासाठी हा समास मुळातून संपूर्ण वाचला पाहिजे. केवळ साहित्यिक रुचीने वाचला तरी तो रसिकाला खचित आवडावा. देहाचे अनुसंधान दूर करण्याची युक्ती साधण्यासाठी पूर्वीच्या आवडीनिवडी, आचार बदलण्याची जरूरी असते व नवीन आवडी व नवे विचार स्वीकारावे लागतात. देहावर व दृश्यावर सहजगत्या सतत राहणारे मन अखंड अभ्यासाने आत्म्यापाशी किंवा स्वस्वरूपाशी ठेवण्यासाठी अविरत धारणा धरावी लागते. इंद्रियांमध्ये पसरलेले मन एकवटून त्याला हृदयकमलात घट्ट ठेवण्याचा नित्य प्रयत्न केला की धारणा यशस्वी होते. ज्याला ही धारणा साधली तो खरा साधक होतो.

**देहाचे अनुसंधान बाजूला सारून आत्मस्वरूपाचे अनुसंधान ठेवण्याची भूमिका साधणे हे साधनेचे मर्म समजावे.**



१९ एप्रिल

**म्हणोनि संदेहरहित ज्ञान। निश्चयाचें समाधान।**
**तेंचि सिद्धांचें लक्षण। निश्चयेंसी।।** (५-१०-२७)

पाचव्या दशकातील सातव्या समासापासून नवव्या समासापर्यंत समर्थांनी बद्ध, मुमुक्षू, आणि साधक यांचे वर्णन केले. आता ते अंतिम, उच्च अवस्थेत पोहोचलेल्या सिद्धांचे लक्षण सांगत आहेत. भगवद्गीतेत आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी व ज्ञानी अशा चतुर्विध भक्तांचे वर्णन आहे. साधकाची लक्षणे वाचल्यावर सांसारिक माणसाला साधक होणे अशक्य आहे असे वाटणे स्वाभाविक आहे. कारण निरासक्तता आणि निरिच्छता यांचे व सांसारिक माणसाचे तर दूरचे नाते! या शंकांचे उत्तर समर्थ देत आहेत. निस्पृहाला अंतस्त्याग व बहिस्त्याग दोन्ही जमतात. सांसारिक मनुष्याला बाह्यत्याग घडतो पण अंतस्त्याग मात्र त्याला हळूहळू जमतो. या दोन्ही त्यागांत मानसिक त्याग मुख्य असल्यामुळे बाह्य अर्थाने निस्पृह जरी नसला तरी अंतस्त्यागाच्या जोरावर सांसारिकही साधक होऊ शकतो. संसारात असूनही त्याला प्रपंचाचा वीट आलेला असतो. त्याच्या बाबतीत अज्ञानाचा त्याग हळूहळू होतो. अशा निस्पृह व सांसारिक साधकाची परिणती 'सिद्ध' होण्यात होते. बद्धाचे अवगुण मुमुक्षूत नसतात. मुमुक्षूचे विशेष साधकात दिसत नाहीत आणि पुढे निवृत्ती झाली आणि साधक निश्चयाने अचल झाला व त्याचा 'संशय' ब्रह्मांडाबाहेर गेला की तो स्वत:च वस्तू होऊन राहतो व सिद्ध होतो. संशयाने केलेले तीर्थाटन, भक्ती, प्रीती, सर्व काही व्यर्थ होय.

**मनात संशय धरून कोणतेही काम केले तर व्यवहारात तसेच परमार्थातही यशाची वानवाच!**



२० एप्रिल

**सिद्धस्वरूपीं नाहीं देहो। तेथें कैचा हो संदेहो।**
**याकारणें सिद्ध पाहा हो। नि:संदेही।** (५-१०-४१)

संशयाचा लवलेशही उरता कामा नये. '**व्यर्थ संशयाचा संत। व्यर्थ संशयाचा पंडित। व्यर्थ संशयाचा बहुश्रुत। निश्चयेंविण॥** (५-१०-२२). संशय संपतो व निश्चय बळावतो तेव्हा सिद्ध अवस्था प्राप्त होते. संदेहरहित ज्ञान आणि निश्चयाचे समाधान हे सिद्धाचे लक्षण आहे. निश्चय कसला करावयाचा ? मुख्य देव कसा आहे याचाच निश्चय करावा. नाना देवांचा घोटाळा करू नये. ज्याने ही चराचर सृष्टी निर्माण केली त्या देवाचा विचार करावा. 'मी कोण' याचा अनुभव येऊ लागला की मुख्य देवांची ओळख पटते. सिद्ध अवस्थेत एखादेवेळी संदेहामुळे देहाचा अभिमान वाटण्याचा धोका असतो. म्हणून आत्मनिश्चयाने समाधानाचे रक्षण करावे. विवेकबुद्धी देहाच्या भानामुळे नष्ट होण्याचा धोका असतो. म्हणून आत्मबुद्धी दृढ केली पाहिजे. नि:संदेह झालेला, निश्चयाचे व अनुभवाचे ज्ञान ज्याच्यापाशी आहे तोच सिद्ध होतो. सिद्ध स्वरूपात देहच नाही तिथे संदेह कुठला ? निर्मळ आत्मवस्तुरूप सिद्ध लक्षणातीत असतात. कारण लक्षणे म्हणजे गुण. मूळ आत्मवस्तू तर निर्गुण आहे. सिद्ध आत्मवस्तूशी एकरूप झालेले असतात. आत्मज्ञान आणि नि:संशयपणा या एकाच ज्ञानमय अवस्थेच्या दोन अभिन्न बाजू असतात. मुंडक उपनिषदात, 'भिद्यते हृदयग्रंथि: छिद्यन्ते सर्वसंशया:। क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे॥' या श्लोकात संशय केव्हा पूर्ण नाहीसा होतो ह्याचे वर्णन आहे.

**निश्चयाची आत्मबुद्धी म्हणजेच मोक्ष -**



## २१ एप्रिल

**देव वोळखावा येक। तेंचि ज्ञान तें सार्थक।**
**येर अवघेंचि निरर्थक। पोटविद्या।।** (६-१-२१)

सिध् धातूचा अर्थ साध्याप्रत जाणे, यशस्वी होणे, अथवा जिंकणे. ज्याचे अज्ञान संपूर्णपणे जिंकले गेले तो सिद्ध होतो. साधना परिपक्व दशेला पोहोचली की साधकाला पूर्णावस्था किंवा सिद्धावस्था प्राप्त होते. त्या एवढा दिव्य, तत्काळ फलदायी आणि आनंदमय अनुभव नाही. आत्मसाक्षात्कार, ब्रह्मज्ञान, अपरोक्षानुभूती, ईश्वरदर्शन अशी अनेक नावे त्याला आहेत. तिळांत तेल, दुधात तूप व प्रवाहात पाणी जसे व्यापून असते तसे आत्मस्वरूप सर्व भूतमात्रांत ओतप्रोत भरून राहिले आहे, असा प्रत्यक्ष अनुभव येतो. सर्व दृश्य वस्तू विराम पावू लागतात. केवळ ब्रह्म तेवढे उरते. या अवस्थेतील सिद्ध पुरुषाचे ज्ञान संशयातीत, निश्चयात्मक आत्मज्ञान असते. त्याच्या वासना नि:शेष नाहीशा झालेल्या असतात; आणि अत्यंत निर्भय होऊन तो स्वानंदात जगत असतो. आत्मस्वरूपाबद्दल अत्यंत नि:संशय ज्ञान असणे हे मुख्य सिद्ध लक्षण समजावे. सिद्धाचे वर्णन केल्यानंतर समर्थ, ईश्वराच्या किंवा देवाच्या शोधना विषयींचे महत्त्व सांगतात. ग्रामाधिपती, राज्यपाल, राष्ट्रपती, महाराज, चक्रवर्ती हे एकाहून एक मोठे आहेत. त्या सर्वांत जगाचा निर्माता ब्रह्मदेव मोठा. परंतु त्याला, जगत्पालक विष्णूला आणि संहारकर्त्या रुद्रालाही निर्माण करणारा जो परमेश्वर आहे, तो सर्वांत मोठा आहे. नाना प्रयत्नांनी त्याला ओळखावा. ज्याच्या अंतरंगांत परमात्मज्ञान जागते तो खरा साधू. परमात्म्याच्या ज्ञानाखेरीज इतर सर्व ज्ञान केवळ पोट भरण्याचे साधन ठरते.

**शरीरात राहणाऱ्या देवाची ध्यानाने भेट घेतली पाहिजे.**



## २२ एप्रिल

**याकारणें ज्ञाता पाहावा। त्याचा अनुग्रह घ्यावा।**
**सारासार विचार जीवा। मोक्ष प्राप्त।।** (६-१-३१)

परमेश्वर भेटावा असे वाटत असेल, तर चांगला योग्य ज्ञाता, संत शोधला पाहिजे. नाहीतर करंट्याला करंटा भेटला तर भाग्य कुठले ? एका रोग्याकडे दुसरा रोगी गेला तर आरोग्य कुठचे ? एका बद्धाकडे दुसरा बद्ध गेला तर तो मुक्त कसा होणार ? त्यासाठी खऱ्या ज्ञात्याचा शोध घेतला पाहिजे. श्रीसमर्थ संपूर्णपणे अद्वैत मताचे तत्त्वज्ञ आहेत. त्यांच्या मतानुसार आपल्या देहासकट हे सारे दृश्य विश्व सतत पालटते म्हणूनच ते सर्वस्वी खरे नव्हे. एक सद्वस्तूच अपरिवर्तनीय आणि सर्वस्वी खरी आहे. ती अचल राहून या चल विश्वाला आधार देते. ती वस्तू ज्ञानमय आणि आनंदमय आहे, म्हणून तिचा साक्षात्कार झाला की संपूर्ण समाधान लाभते. या सद्वस्तूची, माया ही मोठी विलक्षण शक्ती आहे. ती माया बाजूला सारून खऱ्या देवाचे ज्ञान प्राप्त झाले की अत्यंत समाधान वाटते. आत्मस्वरूप हाच खरा देव. त्याचा शोध घेऊन त्याला पाहावे. स्वस्वरूपाचा मार्ग अंतरीचा व सूक्ष्म आहे. त्यासाठी स्वानुभवी मार्गदर्शकच हवा. स्वस्वरूपाचा अनुभव हा एक प्रकारचा शक्तिपातच असतो. सूक्ष्माचा साक्षात्कार झाल्यानंतर जीवाचा अहंकार क्षीण होतो आणि साधना त्वरित फलदायी होते. सद्गुरूच्या पाठिंब्यावाचून परमार्थ साधत नाही, म्हणून आत्मज्ञानी शोधून त्याचा अनुग्रह घ्यावा. त्याचे शिष्यत्व रीतसर स्वीकारावे. त्यानंतर त्याच्या मार्गदर्शनाखाली सारासार विचाराने जीव मुक्त होतो.

**ब्रह्मज्ञानी सद्गुरू जीवाला दृश्याच्या कक्षेतून सूक्ष्माच्या साम्राज्यात नेतात.**



## २३ एप्रिल

**पंचभूतें आणि त्रिगुण। ऐसी अष्टधा प्रकृति जाण।**
**अष्टधा प्रकृतीस नामाभिधान। दृश्य ऐसें।।** (६-२-१४)

पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश ही पंचमहाभूते आणि सत्त्व, रज आणि तम हे त्रिगुण मिळून आठ प्रकारे प्रकृती व्यक्त होते. या अष्टधा प्रकृतीचे दुसरे नाव आहे दृश्य. साररूप ब्रह्म सर्व दृश्य सृष्टीला व्यापून राहते. प्राणिमात्र इंद्रियांच्या कक्षेत वावरतात. त्यामुळे इंद्रियांना जे दिसते ते आपल्याला खरे वाटते. परंतु हा अज्ञानजनित भ्रम असतो. तो बाजूला करून सूक्ष्म ब्रह्म कसे पाहावे हे सद्गुरू शिकवितात. ब्रह्मज्ञानावाचून दुसरा कोणताही उपदेश घेणे म्हणजे धान्य टाकून भुसकट खाण्यासारखे आहे, किंवा खोबरे टाकून करवंटीच खाण्यासारखे आहे. हे सारे अष्टधा प्रकृतीचे रूप सगुण आणि नश्वर आहे. तर परमात्मा एकटा निर्गुण निराकार आहे. वायू ब्रह्माला उडवून नेऊ शकत नाही. ते दिसत नाही पण सर्वत्र व्यापून अधिक राहिले आहे. **प्रगट ते जाणावे असार। आणि गुप्त ते जाणावे सार। गुरुमुखें हा विचार। उमजों लागे।।** (६-२-२०) असे समर्थ सांगतात. जे प्रगट दृश्य ते असार आहे व गुप्त अव्यक्त हे सार आहे. विवेकाच्या बळावर, जे उमजत नाही ते समजून घ्यावे, दिसत नाही ते पाहावे आणि जे कळत नाही ते कळून घ्यावे. जे असाध्य ते सायासाने साध्य करून घ्यावे व कानडे म्हणजे दुर्बोध असेल त्याचा हळूहळू यथाशक्ती अभ्यास करावा.

**सर्वसाधारण मनुष्याला जितके गाव तितके देव दिसतात.**



२४ एप्रिल

**देहबुद्धीनें बांधला। तो विवेकें मोकळा केला।**
**देहातीत होतां पावला। मोक्षपद** (६-२-३६)

परब्रह्माचा शोध करताना वेद, ब्रह्मदेव व शेष अगदी थकून गेले. परब्रह्मज्ञानाचे पहिले साधन म्हणजे अध्यात्मश्रवण. सर्वसाधारण मनुष्य 'माझे शरीर' असे म्हणतो, म्हणजे तो म्हणणारा देहाहून निराळा आहे हे निश्चित. तो मनही नव्हे कारण तो 'माझे मन' म्हणतो. एकूणएक तत्त्वांचा ब्रह्मतत्त्वात लय केला आहे. तेथे मीचा ठावठिकाणा नाही. त्यामुळे पाहणेच संपते. शरीर हे पंचमहाभूतांचे गाठोडे आहे. त्याचा विचार केला तर आत्माच निरंतर असून 'आपण' म्हणून काहीच नाही. ''मी'' जाग्यावर नाही, मग माझ्याबाबतीत जन्मावयाचे व मरावयाचे तरी कोठे राहते ? पाप, पुण्य, यमयातना, इत्यादी गोष्टी निर्गुणाच्या ठिकाणी मुळीच नाहीत. आपण जर ते निर्गुण परब्रह्मच आहोत तर आपल्याला सुद्धा जन्ममरण कोठचे ? देहबुद्धीने म्हणजे ''मी म्हणजे माझा देह'', या कल्पनेने जीव बांधला होता. तो विवेकाने मोकळा केला आणि तो देहावेगळा झाला की त्या जीवाला मोक्षपद मिळते. एका माणसाने वडाच्या पारंब्या पकडल्या व तो लोंबकळू लागला. तो तोंडाने ओरडत होता ''वाचवा हो वाचवा, या वडाने मला पकडून ठेवले आहे.'' मग सद्गुरूसारखा कोणी येतो व म्हणतो - ''तू हात सोड म्हणजे तू मुक्तच आहेस.''

**ज्याला जन्म नाही त्याला मरण कोठचे ?**



## २५ एप्रिल

**यासी म्हणिजे आत्मज्ञान। येणें पाविजे समाधान।**
**परब्रह्मी अभिन्न। भक्तचि जाला।।** (६-२-४३)

मी आत्म्याहून भिन्न नाही. मी देह नाही, हा विचार एकदा केलेलाच पुन्हापुन्हा करावा. तो सतत जागृत ठेवावा. स्वप्नात आपण अनेक गोष्टी पाहतो. अनेक सुखदु:खे भोगतो. पण जाग आली की ते औट घटकेचे जग संपते. तसेच विवेक जागृत झाला की दृश्याचे स्वप्न खंडित होते आणि त्यानंतर आत्मस्वरूपाच्या अनुसंधानाने प्राणिमात्र उद्धरून जातो. ह्या ज्ञानमार्गात, अनुसंधान ठेवण्याचा अभ्यास करावा. त्यातूनच स्वात्मस्वरूपाचा अनुभव उदय पावतो. आत्मज्ञानाने आत्मस्वरूप झाल्यावर देह प्रारब्धावर सोडून स्वानंदात राहावे. अशा रीतीने देव आणि भक्त यांचे ऐक्य घडून येते. स्वस्वरूप किंवा आत्मस्वरूप हे आपले संधान होय. संधानाच्या मागून जाणे याचे नाव अनुसंधान. स्वस्वरूपाच्या मागे राहायचे म्हणजे त्याचे चिंतन करावयाचे. सतत चिंतनाने मन तदाकार होते आणि 'मी आत्मस्वरूप आहे', असा आत्मसाक्षात्कार होतो. ''विवेके सदा स्वस्वरूपी रहावे'' आत्मस्वरूपात तल्लीन होण्याच्या ह्या अवस्थेचे नाव आहे आत्मनिवेदन. प्रथम अध्यात्मश्रवण, नंतर सद्‌गुरुसेवन, गुरुकृपेने आत्मनिवेदन, आणि त्यानंतर 'मी आणि आत्मा एकच आहोत', असे ज्ञान प्राप्त होणे, ह्या चार पायऱ्या व श्रवण, मनन, निदिध्यास व साक्षात्कार ह्या उपनिषदात वर्णन केलेल्या पायऱ्या सारख्याच आहेत.

**निर्गुण आत्मा व आपण एकच असा अनुभव आला**
**की तो मनुष्य जन्मास आल्याचे सार्थक झाले.**



## २६ एप्रिल

**जें जें कांही निर्माण जालें। तें तें अवघेंचि नासलें।**
**परी मुळीं ब्रह्म ते संचलें। जैसें तैसें॥** (६-३-१५)

परमात्मस्वरूप अत्यंत व्यापक, सूक्ष्म आणि शाश्वत आहे. तर दृश्य विश्व मर्यादित, स्थूल आणि अशाश्वत आहे. तरीही हे सर्व दृश्य-जगत त्या परमात्मस्वरूपातच उत्पन्न झालेले दिसते, त्यामध्येच ते जगते, आणि अखेर त्यातच विलीन होते. हा खेळ माया नावाची परमात्म्याची जी शक्ती आहे तिचा आहे. परमात्मा निव्वळ चैतन्यमय आहे, तर विश्व सगुण व निर्गुण यांचे मिश्रण आहे. मनुष्याचा देहही पंचमहाभूतांचा बनलेला आहे. कारण तो विश्वाचा भाग आहे. विवेकाने देहशोधन केले की देह हे तत्त्वांचे गाठोडे आहे हे प्रत्ययास येते. तेव्हा देहबुद्धी नाहीशी होते आणि शुद्ध आत्मस्वरूप उरते - तेच मी आहे, असा अनुभव आला की आत्मज्ञान होते व त्याने समाधान मिळते. निर्गुण, निर्मळ आत्म्याला आकाशाची उपमा देता यावी, पण तो परमात्मा आकाशाहूनही मोठा आणि अणूहूनही सूक्ष्म आहे. आकाश व्यापक आणि विश्व व्याप्य असा भेद आहे. परंतु परमात्माच सगळीकडे भरून राहिला आहे. अणूरेणूही त्याहून निराळा नाही. त्यामुळे व्यापणारा आणि व्याप्य असा भेदच उरत नाही. सगुण माया नाश पावते पण परब्रह्म शाश्वत आहे. ते चळत नाही, ढळत नाही, तुटत नाही, फुटत नाही. उसामधला रस चाखून आपण चोथा फेकून देतो त्याप्रमाणे जगदीश ओळखून इतर सर्व त्याज्य मानले पाहिजे.

**राजहंस ज्याप्रमाणे दूध तेवढे पितो आणि पाणी वगळतो,**
**तसे ज्ञात्याने माया वगळून आत्मतत्त्व ओळखावे.**



## २७ एप्रिल

**तत्त्वीं गुंतला म्हणे कोऽहं। विवेक पांहातां म्हणे सोऽहं।**
**अनन्य होतां अहं सोऽहं। मावळलीं।।** (६-३-३५)

आपण उसाचा रस पितो व चोथा टाकतो, हा दृष्टान्त परमेश्वराच्या बाबतीत योग्य नाही. उसाचा रस पातळ व गोड असतो; आत्मा मात्र निश्चल व शाश्वत असतो. त्याच्याविषयी ग्राह्य अग्राह्य असा भेद नसतो.

एखादी वाऱ्याची झुळूक आकाशात निर्माण होते, मग त्या वायूपासून तेज, तेजापासून पाणी आणि पाण्यापासून भूमंडळ आकार घेते. या भूमंडळापासून जे जे असंख्य जीवमात्र निर्माण झाले, ते ते नष्ट झाले. परंतु मूळ ब्रह्म मात्र जसेच्या तसेच राहिले आहे. मडक्याच्या आत पोकळी असते - ते मडके फुटल्यानंतर ती पोकळी नाश पावत नाही. ती पोकळी पूर्वीही होती, मडके असतानाही होती व मडके नसले तरी पुढेही असणार. त्याचप्रमाणे जगाच्या निर्माणापूर्वी, सद्य: स्थितीत तसेच प्रलयानंतरही ब्रह्म होते, आहे व राहील. ज्ञाते लोक अशा अविनाशी ब्रह्माची सेवा करतात. सार-असार यांचा विचार सद्गुरूच्या मार्गदर्शनाखाली करू लागले की असार जाऊन निर्गुण ब्रह्म हे सार तेवढे शिल्लक उरते. निर्गुणाला जन्ममरण, पापपुण्य यांचे भय नाही. त्यामुळे निर्गुणाशी एकरूप होणे म्हणजे मुक्त होणे. ''कोऽहम्'' म्हणजे मी कोण आहे, हा प्रश्न, ही जिज्ञासा नंतर ''तो मी आहे'' (सोऽहं) अशी जाणीव होते आणि अनन्य होताच हे दोन्ही भाव मावळतात.

**माया दूर झाली की मनुष्य देहधारी असला तरी देहातीत होतो.**



२८ एप्रिल

**आपुलाली उपासना। अभिमान लागला जना।**
**याचा निश्चयो निवडेना। साधुविण।।** (६-४-१२)

ब्रह्मनिरूपण करण्यापूर्वी समर्थांनी चारही युगांच्या कालमर्यादा दिल्या. ह्या चौथ्या समासात आहेत. कृतयुग १७२८ हजार वर्षांचे. त्रेतायुग १२९६ हजार वर्षांचे, द्वापारयुग ८६४ हजार वर्षांचे तर कलियुग ४३२ हजार वर्षांचे. या सर्वांची बेरीज होते ४३२० हजार वर्षांची. हा एवढा प्रदीर्घ काल म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस. असे ब्रह्मदेवाचे १००० दिवस म्हणजे विष्णूची एक घटका होते. विष्णूच्या १००० घटका म्हणजे शंकराचे एक पळ व शंकराची १००० पळे म्हणजे शक्तीचे अर्धे पळ भरेल. अशी ब्रह्मांडाची रचना होते व जाते. पण ब्रह्म मात्र अखंड आहे. समर्थांच्या काळी कलियुगाची ४७०८ वर्षे पूर्ण झाली होती असा उल्लेख आहे; म्हणजे जगबुडी व्हायला अजून अनेक वर्षे आहेत. अशी अनेक युगचक्रे आली व गेली तरी ब्रह्म मात्र अविकारी व अचल आहे. त्याप्रमाणे आपापल्या अनुभवानुसार प्रत्येक जण एका विशिष्ट देवतेला सर्वश्रेष्ठ समजत असला तरी कल्पांताच्या वेळी त्या सर्व देवताही काळाच्या उदरात विलीन होतात. शाश्वत टिकते ते परब्रह्म. शास्त्राधाराप्रमाणे "यद् दृष्टम् तत् नष्टम्", म्हणजे जेवढे दृश्यात असेल तेवढे नाशिवंत आहे. हे रहस्य साधू जाणतात. त्यामुळे कोणता देव मोठा या वादात ते पडत नाहीत. आत्मा सर्वत्र व्यापक आहे. स्वप्नात पाहिलेले रंक व राव, स्वप्नांन्ती दोघेही सारखेच.

**एका देवापेक्षा दुसरा श्रेष्ठ वगैरे अभिमान धरणे म्हणजे चित्रात काढलेल्यां सेनेतील लहान-मोंठा ठरविणे होय.**



## २९ एप्रिल

**करिती ब्रह्मनिरूपण। जाणती ब्रह्म संपूर्ण।**
**तेचि जाणावे ब्राह्मण। ब्रह्मविद॥** (६-४-२४)

जसे स्वप्न खोटे तसा आपला जन्मही खोटा. त्यामुळे, 'मी थोर आहे', असा जो अहंकार जीव बाळगतो तो खोटा आहे. तो भ्रम आहे. ज्याला आत्मज्ञान झाले तोच खरा महाजन. त्याला सगळ्यात परमेश्वर एकटा थोर आहे याची जाणीव झालेली असते. तो परमात्मा निर्गुण निराकार असून त्याला उत्पत्ती नाही, संहार नाही. नाम आणि रूप हा सर्व अनुमानाचा विषय आहे. ब्रह्म प्रलयाच्या पलीकडील आहे. त्याला नामरूप नाही. मनुष्य जीव आहे. तो अल्प, अंतवंत, व परिमित आहे. याच्या उलट परमात्मा सर्वव्यापक, अनंत व अपरिमित आहे. परिमित जीवाने अपरिमित परमात्मस्वरूपाची कितीही कल्पना केली तरी ती तोकडी पडते. मानवी दृष्टीने काळ अनंत आहे. मागे किती काळ गेला कोणास ठाऊक ? आणि पुढे किती काळ जाणार आहे कोणास ठाऊक ? अनंत काळाच्या दृष्टीने ह्या जगातील मानवी जीवन एखाद्या स्वप्नासारखे अल्प आहे. म्हणून त्याचे ज्ञान करून घेणारा आत्मज्ञानी पुरुष खरा थोर होय. ब्राह्मण जातीत जन्मला म्हणून ब्राह्मण मानू नये तर मग खरा ब्राह्मण कोण ? जो ब्रह्मनिरूपण करतो, संपूर्ण ब्रह्म जाणतो तो ब्रह्मवेत्ता, खरा ब्राह्मण मानावा.

**ब्रह्म जाणतो तो ब्राह्मण. ब्राह्मणाच्या पोटी जन्मला म्हणून नव्हे.**



## ३० एप्रिल

**ब्रह्म निर्गुण निराकार। माया सगुण साकार।**
**ब्रह्मास नाही पारावर। मायेस आहे।।** (६-५-२)

ब्रह्म आणि माया यांतील भेद समर्थांनी ह्या समासात स्पष्ट केला आहे. माया ह्या शब्दाची व्युत्पत्ती अशी आहे - मा या धातूचा अर्थ मोजणे, मावणे किंवा समावेश होणे असा आहे. (पहा - प्रमाण, अनुमान, इत्यादी) **''विश्वं माति यस्याम् सा माया''**. जिच्यात विश्व मावते, जी परब्रह्म्याला मोजमापात आणते ती शक्ती माया होय. बृहदारण्यक उपनिषदात याज्ञवल्क्य मैत्रेयीला सांगतात, **इदं सर्वम् यदयम् आत्मा**। हे जे सारे आहे ते आत्मस्वरूप आहे. विश्वाचे मूळ तत्त्व एकच एक आत्मा आहे. त्याच्या ठिकाणी अनेकपणा नाही. मग प्रश्न असा उभा राहतो, की अनेकपणाने भरलेले जग कसे निर्माण झाले? याचे एक उत्तर असे की आत्म्यावाचून इतर वस्तूच नाही, म्हणून आत्माच अनेकपणाने दिसतो. या उत्तरात द्वैत व अद्वैत दोन्ही सारखेच सत्य ठरतात. परंतु एकपणा व अनेकपणा परस्परांविरुद्ध असल्याने दोन्ही एकाच वस्तूच्या बाबतीत सारखे सत्य असू शकत नाहीत. 'अद्वैतापासून द्वैतमय जग झालेच कसे?' असा प्रश्न स्वाभाविक आहे, परंतु हा प्रश्न आत्मज्ञानी पुरुषाला येत नाही. त्याला एका आत्मस्वरूपाहून अन्य काही अनुभवायला येतच नाही. आत्मज्ञान नसलेल्यांनाच हा प्रश्न पडतो. ब्रह्म निराळे, जग निराळे व त्यांना पाहणारा मी निराळा अशा भेदबुद्धीने अनेकपणामध्ये जगणाऱ्या जीवांना हा प्रश्न पडतो. त्यांना दृश्य विश्व खरे वाटू लागते.

**अद्वैत सत्य आहे असा आत्मज्ञानी पुरुषांचा प्रत्यक्ष अनुभव आहे.**